**बबलाद कोपबं,ता.अक्कलकोट, जि.सोलापूर, या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१०/(२५५/२०१०)/ ल.पा.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ जूलै, २०१७

वाचा

**१) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविमं/२१०/(१०५७/२०१०)/लपा-१/९५४५, दि.२८/१२/२०१० चे पत्र.**

**२) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ यांचे पत्र क्र.व्यअस- २०१७/प्रक्रं.१२९/अर्थसं-२, दि.१६जून,२०१७**

**प्रस्तावना**

बबलाद कोपबं, ता.अक्कलकोट जि.सोलापूर या योजनेस शासन निर्णय क्र.कोपबं ४९१/८३४/(२४०/९१)/लपा-१,मंत्रालय,मुंबई-३२, दिनांक १८/०७/१९९२ अन्वये एकूण रु.२५.४१ लक्ष इतक्या रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. सदर मुळ प्रशासकिय मान्यता प्रस्ताव १९९०-१९९१ च्या दरसुची नुसार तयार करण्यात आलेले होता.प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीच्या दरातील वाढ,जास्त दराची निविदा, भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ,संकल्पचित्रातील बदल, अपुऱ्या तरतुदीमुळे झालेली वाढ,इतर कारणांमुळे व अनुषंगिक खर्चामुळे किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन १९९९-२००० ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु.९६.९४ लक्ष इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१) बबलाद कोपबं, ता.अक्कलकोट जि.सोलापूर या योजनेस सन १९९९-२००० ची दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित अंदाजपत्रकानुसार कामाच्या अंदाजित रु.९६.९४ लक्ष (रुपये शहान्नव लाख चौऱ्यान्नव हजार फक्त ) या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी कामासाठीची एकूण तरतूद रु.८८.१८ लक्ष (रुपये अठ्ठ्याऐंशी लाख अठरा हजार फक्त) व अनुषंगिक खर्चासाठीची एकूण तरतूद रु.८.७६ लक्ष (आठ लाख शहाहत्तर हजार फक्त) आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२) व्यय अग्रक्रम समितीच्या दि.३१ मे, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत विभागाच्या सचिवांनी सदर प्रकल्पाचे काम अंतिम टप्प्यात असल्याचे स्पष्ट केल्याने पुढील अटींच्या पुर्ततेच्या अधिन प्रस्ताव मान्य करण्यात आला आहे.

अ) जलसंपदा विभागाच्या दि.०२ मे,२०१७ च्या शासन निर्णयानुसार या प्रकल्पांतर्गतच्या लाभक्षेत्रास सुक्ष्म सिंचनास पुरक वितरण व्यवस्था निर्माण करण्याच्या अनुषंगाने आढावा घेऊन भूसंपादनावरील खर्चातील बचतीचा विभागाने प्राधान्याने आढावा घ्यावा.

ब) प्रकल्पाचे काम विभागाने चालू आर्थिक वर्षात पूर्ण करणे बंधनकारक राहील.

३) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च १९०,सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर क्षेत्रातील गुंतवणूका,(००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (ल.पा.) (उर्वरित महाराष्ट्र) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.निधीची मंजूरी मिळाल्याशिवाय या योजनेच्या कामावर कोणत्याही कामाचा खर्च करू नये.

४) हा शासन निर्णय,नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३१/का.१४३४ दि. ०९/११/२०१६ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३१३/व्यय १२ दि.२३/१२/२०१६ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समीतीने दि. ३१ मे, २०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार व संदर्भ क्रं २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५) या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र.१६७/२०१७ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१९१७५३५९३८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2017.07.19 17:51:26 +05'30'

**(म.ई.धरणे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.
४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
५. मुख्य अभियंता(विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
६. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. जिल्हाधिकारी सोलापूर, सोलापूर
८. अधीक्षक अभियंता, भिमा कालवा मंडळ, सोलापूर.

९. कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१,सोलापूर

१०.उपसचिव (लपा)/ अवरसचिव(लपा) /उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

११.कार्यासन अर्थ १-२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.

१३.लपा १ संग्रहार्थ

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. सुप्रमा २०१०/(२५५/२०१०) ल.पा.१, दि.१९ जूलै, २०१७ चे सहपत्र)

## विवरण पत्र

बबलाद कोपबं,ता.अक्कलकोट जि.सोलापूर अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| | अ - प्राथमिक कामे | ०.१० |
| | ब - भू संपादन | ०.६२ |
| | सी - कामे | ८१.१५ |
| | के- इमारत | ०.९३ |
| | ओ संकीर्ण | ० |
| | पी देखभाल | ० |
| | आर दळणवळण | ५.३८ |
| | अनुषंगिक खर्च | ८.७६ |
| | **एकूण** | **९६.९४** |

## ठळक वैशिष्टे

१. योजनेची सिंचन क्षमता - ४४१ हेक्टर
२. एकूण पाणी साठा - ८२१ स.घ.मी.
३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. ११८०७/-स.घ.मी.
४. लाभव्यय गुणोत्तर - १.७१